कै.श्री.यशवंतराव चव्हाण मेमोरियल मेडिकल ॲण्ड रुरल डेव्हलपेंट फाऊंडेशन, संचालित दंत महाविद्यालय, अहमदनगर यांना जिल्हा रुग्णालय, अहमदनगर येथील खाटा शैक्षणिक प्रयोजनार्थ वापरण्यास मंजूरी देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः खाशैप्र -२०२४ /प्र.क्र. १९०/आरोग्य-३

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
तारीख: १३ ऑगस्ट, २०२४

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-एचएसजी १६९०/प्र.क्र.९६/आरोग्य-३, दिनांक- ०३.०८.१९९०.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-संकिर्ण २०१३/प्र.क्र.३०७/आरोग्य-३, दिनांक- ०३.०८.२०१३.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-संकिर्ण २०१३/प्र.क्र.२२९/आरोग्य-३, दिनांक- ०३.०९.२०१३.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-खाशैप्र-२०१९/प्र.क्र.२३४/आरोग्य-३, दिनांक- ०५.०८.२०१९.
५) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-आसेआ/कक्ष-३-टे-१/ दंत महाविद्यालय अ. नगर/प्रशिक्षण नुतनीकरण मुदतवाढ/११७६८-७०/२४, दिनांक-३०.०५.२०२४.

प्रस्तावना -

कै.श्री.यशवंतराव चव्हाण मेमोरियल मेडिकल ॲण्ड रुरल डेव्हलपेंट फाऊंडेशन संचालित दंत महाविद्यालय, अहमदनगर या खाजगी प्रशिक्षण संस्थेस जिल्हा रूग्णालय, अहमदनगर येथील १०० खाटा शैक्षणिक प्रयोजनार्थ प्रात्यक्षिक अनुभवासाठी वापरण्यास संदर्भ क्र.४ नुसार ५ वर्षाकरीता परवानगी देण्यात आली होती. तथापि, सदर मुदत दि.१२.०९.२०२३ रोजी संपुष्टात आल्याने पुढील ५ वर्षाकरीता नुतनीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

कै.श्री.यशवंतराव चव्हाण मेमोरियल मेडिकल ॲण्ड रुरल डेव्हलपेंट फाऊंडेशन संचालित दंत महाविद्यालय, अहमदनगर येथील १०० खाटा शैक्षणिक प्रयोजनार्थ प्रात्यक्षिक अनुभवासाठी प्रतिदिन प्रतिखाट रुपये १५०/- इतक्या दराने वापरण्यास दिनांक १२.०९.२०२३ पासून पुढील ५ वर्षाकरीता या शासन निर्णयान्वये खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) शासन निर्णय, दि.०३.०८.२०1३ नुसार खाटांसाठी आकारावयाचे शुल्क रुपये १५०/- प्रतिदिन प्रतिखाटा याप्रमाणे संस्था दर तिमाहीच्या पहिल्या महिन्याच्या पहिल्या आठवडयात, तीन महिन्याच्या कालावधीसाठी अग्रिम स्वरुपात चुकते करील. खाटा वापरण्याच्या कालावधीत शासन ठरविल ते सुधारीत शुल्क त्या दिनांकापासून चुकते करण्याचे संस्थेवर बंधनकारक राहिल. तसे न केल्यास ही व्यवस्था रद्द करण्यात येईल व याबाबतचा शासनाचा निर्णय अंतिम राहिल.

२) उपरोक्त दिनांक ०३.०८.१९९० येथील शासन निर्णयासोबत जोडलेल्या करारपत्राच्या विहित नमून्याप्रमाणे संस्थेने उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक यांचे समवेत करारपत्र करुन ते नोंदणीकृत करुन घ्यावे व या करारपत्रातील कोणत्याही अटींचे पालन न केल्यास किंवा अटींचा भंग झाल्यास ही व्यवस्था रद्द करण्यात येईल व याबाबतचा शासनाचा निर्णय अंतिम असेल.

३) या संदर्भात सार्वजनिक आरोग्य विभाग आणि वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग ह्यांनी वेळोवेळी निर्देशीत केल्याप्रमाणे अन्य अटी व शर्तींचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

२. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, अहमदनगर यांनी विहित अटी व शर्तींच्या अधिन राहून संबंधीत संस्थेकडून करारपत्र करुन शैक्षणिक प्रयोजनार्थ प्रात्यक्षिक अनुभवासाठी सुरुवातीस ५ वर्षाकरीता खाटांचा वापर करण्यास परवानगी द्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१३१५५२४२७४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY DATTARAM MAHADESHWAR

Digitally signed by SANJAY DATTARAM MAHADESHWAR
DN: cn=SANJAY DATTARAM MAHADESHWAR, o, ou, email=sanjay.mahadeshwar@nic.in, c=IN
Date: 2024.08.13 16:19:50 +05'30'

**(सं.द. महाडेश्वर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
२. संचालक-१, आरोग्य सेवा, मुंबई
३. सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) पुणे
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, अहमदनगर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
८. प्राचार्य, कै.श्री.यशवंतराव चव्हाण मेमोरियल मेडिकल ॲण्ड रुरल डेव्हलपेंट फाऊंडेशन संचालित दंत महाविद्यालय, अहमदनगर
९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३)